आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना या योजनेकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**(लेखाशिर्ष २८१० ०९७४)**

महाराष्ट्र शासन.
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/प्र.क्र.९/कार्यासन.६.
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०१९/प्र. क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०१९/प्र. क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ व दि. ०३.०१.२०२०
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,नस्ती क्र. बीयुडी-२०१९ /प्र. क्र.२८९/ ऊर्जा -७.

**शासन निर्णय -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमातीच्या वैयक्तिक लाभार्थ्यांना वीजदरात सवलत देण्यासाठी मागणी क्र.टी-५, २८१०, नवीन व नवीकरणीय उर्जा, ०० ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना (१०० टक्के राज्यस्तर योजना) (कार्यक्रम) लेखशिर्ष (२८१० ०९७४), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षात रु.२०००.०१ लाख इतका निधी पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित केला आहे. यानुषंगाने उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भीत क्र. ३ येथील प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भीत वाचा क्र. १ व २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये निश्चित केलेल्या मर्यादेत उपरोक्त योजनेसाठी ( २८१० ०९७४ ) या लेखाशिर्षाखाली रु.१२००.०० लाख (रुपये बारा कोटी फक्त ) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव ( ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व उद्योग,उर्जा व कामगार विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत फक्त आदिवासी लाभार्थ्यांना लाभ देय असल्याने सदर तरतुदीतून फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांसाठी खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** क्रमांक १ व २ येथील शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०६१७१०४०९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.02.13 17:43:21 +05'30'

रविंद्र दि.औटे

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( उर्जा ),उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२. विकास आयुक्त तथा उद्योग संचालक, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अध्यक्ष तथा व्यवस्थापकिय संचालक, महावितरण,मुंबई
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन क्र. ३ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई